**श्री. अशोक बाबुराव पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अशंराशीकरण) नियम, १९८४ व सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी योजना लागू करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.भनिनि-२०१५/७९३/प्र.क्र.१३५/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २६ ऑगस्ट, २०१५.

वाचा :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२/२००२/१५२७/प्र.क्र.१२४/नवि-२७, दि.३०.१२.२००२.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१३००६/२०/प्र.क्र.५/नवि-२७, दि.१७ मे, २००६.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२/१३/१०३०/प्र.क्र.१७६/नवि-२७, दि.०४.०३.२०१४.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारणा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/गट-अ/ससंनर/ना.नि./प्रशा-१/११९९, दि.०४.०३.२०१४.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारणा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/ससंनर/ना.नि./अबापा/प्रशा-१/३६, दि.२०.०५.२०१५.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाच्या **संदर्भ-१** येथील दि.३०.१२.२००२ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री. अशोक बाबुराव पाटील, तत्कालीन सहाय्यक रचनाकार (वर्ग-२), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांची नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून नामनिर्देशनाने "नगर रचनाकार (गट-अ)" पदावर दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली होती व ते या पदावर दि.०७.०१.२००३ (म.पू.) रोजी रुजू झाले होते.

**०२.** नगर विकास विभागाच्या **संदर्भ-२** येथील दि.१७ मे, २००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री. अ. बा. पाटील, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांचा नगर रचनाकार (गट-अ) पदाचा ०२ वर्षाचा परिविक्षा कालावधी दि.०६.०१.२००५ (म.नं) रोजी संपुष्टात आणण्यात येऊन त्यांची दि.०७.०१.२००५ (म.पू.) पासून "नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियमित नियुक्ती करण्यात आली आहे.

**०३.** तद्नंतर, महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या “सहाय्यक संचालक, नगर रचना” (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.६,६००/-) पदाच्या परिक्षेस बण्याकरिता श्री. अ. बा. पाटील, तत्कालीन नगर रचनाकार यांनी त्यांच्या दि.२९.०४.२०१३ व दि.०६.०८.२०१३ च्या पत्रान्वये संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची पूर्वपरवानगी घेऊन रितसर अर्ज सादर केला होता.

०४. नगर विकास विभागाच्या **संदर्भ-३** येथील दि.०४.०३.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री. अशोक बाबुराव पाटील, तत्कालीन नगर रचनाकार (गट-अ) यांची नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून नामनिर्देशनाने "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित)" (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.६,६००/-) पदावर दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली आहे.

०५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या **संदर्भ-४** येथील दि.०४.०३.२०१४ च्या कार्यकारी आदेशान्वये श्री. अ. बा. पाटील, तत्कालीन नगर रचनाकार (गट-अ) यांनी नगर रचनाकार (गट-अ) पदावरुन दि.०५.०३.२०१४ (म.नं.) रोजी कार्यमुक्त होऊन दि.०६.०३.२०१४ (म.पू.) पासून "सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ)" पदाचा कार्यभार स्वीकारलेला आहे. म्हणजेच श्री. अ. बा. पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ) यांच्या दोन्ही नियुक्त्यांमध्ये खंड पडलेला नाही.

०६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-५** येथील दि.२०.०५.२०१५ च्या पत्रान्वये श्री. अ. बा. पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी योजना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

०७. सबब, श्री. अ. बा. पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना यांची सहाय्यक संचालक, नगर रचना पदावरील नियुक्ती ही दि.०१.०१.२००५ नंतरची असल्याने त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. अशोक बाबुराव पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांची नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) पदावरील (दि.०७.०१.२००३) नियुक्ती ही दि.०१.०१.२००५ पूर्वीची असल्याने व ते वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील सर्व अटींची पूर्तता करीत असल्याने त्यांची “नगर रचकार (गट-अ / राजपत्रित)” (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.५,४००/-) पदावरील सेवा “सहाय्यक संचालक, नगर रचना” (वेतनसंरचना रु.१५,६००-रु.३९,१००+ग्रेड पे रु.६,६००/-) पदास जोडण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. श्री. अ. बा. पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांना नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) पदावरील सेवा जोडून देण्यास शासन मान्यता देण्यात येत असल्याने त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधी योजना लागू करण्यात येत आहे. तसेच श्री. अ. बा. पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना यांनी “नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)” पदावर केलेली पूर्वीची सेवा व नियमित वेतनसंरचनेतील सेवा, त्यांच्या निवृत्तिवेतन लाभासाठी ग्राह्य धरण्यात येत आहे.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५०८२६१५३९४४४१२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam K Salimath
Date: 2015.08.26 15:43:25 +05'30'

**(एस. के. सालीमठ)**
**महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.**

**प्रति,**

१) श्री. अशोक बाबुराव पाटील, सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित),
२) उप संचालक, नगर रचना, बृहन्मुंबई यांचे कार्यालय, मुंबई-४०० ००१,
**यांना (संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(०३-प्रती)**
६. सह संचालक, नगर रचना, कोंकण विभाग, कोंकण भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
८. उप संचालक, नगर रचना, बृहन्मुंबई यांचे कार्यालय, मुंबई-४०० ००१.
९. प्रधान सचिव (नवि-१), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती / नवि-२७.

..................................................................